**आदिवासी विकास विभागाच्या शासकीय आश्रमशाळा / वसतीगृहातील विद्यार्थ्यांना देण्यात येणा-या आहाराचे प्रमाण ठरविणे.**

**महाराष्ट्र शासन**

आदिवासी विकास विभाग

शासन निर्णय क्रमांक: याचिका-२००९/प्र.क्र.४८/का.१३

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक : २१ डिसेंबर, २००९

वाचा : १) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक : अआशा-२००४/प्र.क्र. ३७/का.११, दिनांक २ ऑगस्ट, २००४.

२) शासन शुध्दीपत्र, आदिवासी विकास विभाग,क्रमांक: अआशा-२००४/प्र.क्र.३७/का.११, दिनांक १ फेब्रुवारी, २००५.

३) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक : अआशा-२००४/प्र.क्र. ३७/का.११, दिनांक २८ फेब्रुवारी, २००८.

प्रस्तावना : सध्या राज्यात ५५१ शासकीय आश्रमशाळा कार्यरत असून त्यामध्ये एकूण १,९१,२१३ आदिवासी विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. राज्यातील आदिवासी विद्यार्थ्यांसाठी ४१६ शासकीय वसतीगृहांमध्ये सुमारे ४१,७४० इतके आदिवासी विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. शासनाच्या उपरोक्त दिनांक २ ऑगस्ट, २००४ च्या शासन निर्णयानुसार शासकीय/ आदिवासी वसतीगृहात राहणाऱ्या आश्रमशाळेतील विद्यार्थ्यासाठी आहाराचे प्रमाण निश्चित करण्यात आले आहे.

मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी दाखल केलेल्या सुओ-मोटो रिट पिटीशन क्रमांक १४२०/२००८ प्रकरणी मा. उच्च न्यायालयाने दिनांक ११.१२.२००९ रोजी झालेल्या सुनावणी दरम्यान शासकीय आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांना सकाळच्या न्याहारीसोबत २५० मि.ली. दुध देण्यात यावे असे आदेश दिले आहेत. तसेच विद्यार्थ्यांची सकाळची न्याहारी, दुपारचे जेवण व रात्रीचे जेवण यांच्या वेळा ठरवून दिलेल्या आहेत. त्यानंतर सदर प्रकरणी दि. १६.१२.२००९ रोजी झालेल्या सुनावणी दरम्यान शासकीय आश्रमशाळा/वसतीगृहातील विद्यार्थ्यांना दुध आणि केळे व ज्या आश्रमशाळांमध्ये दुध उपलब्ध करुन देणे शक्य नाही तेथे नाचणीसोबत अंडे देण्यात यावे असे सुधारित आदेश देण्यात आले आहेत. त्यानुसार शासकीय आश्रमशाळेतील व वसतीगृहातील विद्यार्थ्यांच्या न्याहारीचा व भोजनाचा कार्यक्रम सुधारित करणे गंरजेचे आहे.

**शासन निर्णय :** मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी दाखल केलेल्या सुओ-मोटो रिट पिटीशन क्रमांक १४२०/२००८ प्रकरणी दिनांक ११.१२.२००९ व १६.१२.२००९ रोजी झालेल्या सुनावणी दरम्यान मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी दिलेल्या आदेशानुसार आदिवासी विकास विभागाच्या शासकीय आश्रमशाळा/वसतीगृहातील विद्यार्थ्यांची न्याहारी व भोजनाचा कार्यक्रम याव्दारे खालीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहे.

| वार | नाश्त्याचा मेनू |
|---|---|
| सोमवार | पोहे |
| मंगळवार | उपमा |
| बुधवार | खिचडी |
| गुरवार | उसळ (मटकी) |
| शुक्रवार | पोहे |
| शनिवार | उसळ (चना) |
| रविवार | उपमा |

| अ.क्र. | तपशिल | वेळ | मेनू |
|---|---|---|---|
| १. | सकाळचा नाश्ता | सकाळी ७ ते ८ | नियमित नाश्ता व त्यासोबत २५० मि.ली. दुध व केळे तसेच जेथे दुध उपलब्ध होत नसेल तेथे नाचणी आणि अंडे. |
| २. | दुपारचे जेवण | दुपारी १.०० ते १.३० | वरण, भात, भाजी व किमान २ पोळया व वाढीव भात विद्यार्थ्यांच्या इच्छेनुसार |
| ३. | रात्रीचे जेवण | संध्याकाळी ६ ते ७ | वरण, भात, भाजी व किमान २ पोळया व वाढीव भात विद्यार्थ्यांच्या इच्छेनुसार |

२. दुग्ध व्यवसाय विकासामार्फत किमान गुण प्रतीचे गायीचे दुध खरेदीसाठी प्राथमिक दुग्ध सहकारी संस्थांमार्फत दुध उत्पादकांना रु. ११.५० प्रतिलिटर दर देण्यात येतो. मात्र, उक्त सरासरी दरापेक्षा रु. १/- ते १.५० जास्त दर दिल्यास स्थानिक शेतक-यांकडून चांगल्या प्रतीचे दुध पुरेशा प्रमाणात उपलब्ध होऊ शकेल. या दृष्टीने आश्रमशाळेतील/वसतीगृहातील विद्यार्थ्यांना चांगल्या प्रतीचे व पुरेशा प्रमाणात दुध उपलब्ध व्हावे यासाठी सर्व मुख्याध्यापक यांनी आश्रमशाळा/वसतीगृहातील विद्यार्थ्यांना दयावयाचे दुध शासकीय दुग्ध संकलन सोसायटीकडून वाहतुकीसह गायीचे दुध रु. १३/- (रु. तेरा फक्त) प्रति लिटर प्रमाणे खरेदी करावे. ज्या आश्रमशाळेच्या ठिकाणी दुध संकलन सोसायटी जवळपास नसेल तेथील मुख्याध्यापकांनी सदरचे दुध हे स्थानिक शेतक-यांकडून रु.१३/- (रु. तेरा

फक्त) प्रति लिटर प्रमाणे खरेदी करावे. अशी खरेदी करीत असतांना ज्या आदिवासी कुटुंबांना दुधाळ जनावरांचा पुरवठा या आदिवासी विकास विभागाच्या योजनेअंतर्गत गायीचे वाटप केले आहे, अशा शेतक-यांकडून प्राधान्याने दुध खरेदी करावे.

३. शासकीय आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांना चांगल्या प्रतीचे व पौष्टिक दुधाचा पुरवठा व्हावा यादृष्टीने उपलब्ध होणा-या दुधाची शास्त्रोक्त पध्दतीने तपासणी करण्यासाठी लॅक्टोमिटर व आवश्यक त्या संयत्राची खरेदी जिल्हा दुग्ध विकास अधिकारी यांच्या सल्ल्याने विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन प्रकल्प अधिकारी यांनी करावी. लॅक्टोमिटर व इतर संयत्र वापराबाबत दुग्ध विकास यंत्रणेच्या संबंधित प्रयोगशाळा प्रमुख यांचेकडून आश्रमशाळेतील (दोन व्यक्तिंना) विज्ञान शिक्षक/अधिक्षक यांना प्रशिक्षित करण्यात यावे. नियमित खरेदी होणा-या दुधाचे प्रत्येक आठवडयातून किमान दोन वेळा (रॅन्डम पध्दतीने) तपासणी करुन दुधातील घनघटक उदा. स्निग्धता, प्रोटीन्स, व्हिटॅमिन्स, कार्बोहाड्रेटस् (घृनांश विरहित घनघटक टक्केवारी ८.५%) इत्यादिची नोंद स्वतंत्र रजिस्टरमध्ये अधिक्षक व तपासणी करणा-या शिक्षकाच्या दिनांकित स्वाक्षरीसह ठेवण्यात यावी. कोणत्याही परिस्थितीत भेसळयुक्त व कमी प्रतीचे दुध स्वीकारण्यात येऊ नये.

४. दुध साठवून ठेवण्यासाठी आवश्यक क्षमतेचा दुधाचा ॲल्युमिनीयम कॅन प्रत्येक आश्रमशाळेस पुरविण्यात यावा. तसेच विद्यार्थ्यांना दुध वाटप करण्यासाठी स्टीलचा ३०० मि.ली. चा ग्लास देखील पुरविण्यात यावा . दुध गरम करण्याकरिता व साठविण्यासाठी भांडयांची व्यवस्था विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन प्र.अ.यांनी खरेदी करावी. जर जुने ॲल्यूमिनियमचे भांडे चांगल्या स्थितीत असेल तर त्याचा वापर करावा.

५. अंडी खरेदी करतांना साधारणत: शंभर अंडयाच्या भावाप्रमाणे खरेदी करावी. शंभर अंडयांचा भाव रु ३५०/- ३६० इतका असतो. त्याप्रमाणे अंडयांची खरेदी करावी. अंडयांचा साठा एक आठवडयापेक्षा जास्त कालावधीकरीता करु नये.

६. ३५ ग्रॅम नाचणीचे पीठ भाजुन घ्यावे व नंतर त्यात योग्य प्रमाणात ऊकळलेले पाणी घालुन लापशी करण्यांत यावी. लापशी चविष्ट बनण्यासाठी त्यामध्ये मीठ घालुन ती मुलांना खाऊ स्वरुपात दयावी. या सोबत उकडलेले अंडेसुध्दा मुलांना न्याहारी म्हणुन देण्यात यावे. नाचणीचे पीठ किंवा अख्खी नाचणी प्रकल्प अधिकारी, यांनी स्थानिकरित्या स्थानिक बाजारभावाने खरेदी करावी. जर अख्खी नाचणी खरेदी केली असेल तर त्याचे पीठ तयार करुन वर उल्लेखित कृतीप्रमाणे दयावे.

७. केळी खरेदी करतांना साधारणत: रुपये २/- प्रती केळे याप्रमाणे खरेदी करण्यात यावी.

८. शासकीय आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांना दयावयाचे दुध, नाचणी, केळी व अंडी इत्यादिवर होणारा खर्च शासकीय आश्रमशाळा/वसतीगृहातील विद्यार्थ्यांना देण्यात येणा-या आश्रमशाळा समूह

योजना या लेखाशिर्षाखाली चालू आर्थिक वर्षाकरिता उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

९.    सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

१०.    सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २००९१२२११२०२९२७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(डॉ. पी.एस. मीना)
प्रधान सचिव

प्रति,
मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे स्वीय सहाय्यक.
मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे स्वीय सहाय्यक.
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
व्यवस्थापकीय संचालक, महा. राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर/नाशिक/ठाणे/अमरावती.
शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
शिक्षण संचालक,(उच्च शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
जिल्हा पुरवठा अधिकारी, नागपूर/नाशिक/ठाणे/अमरावती.
वित्त विभाग(व्यय-१४/अर्थसंकल्प-१७), मंत्रालय, मुंबई.
अन्न, नागरी , पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
मा. प्रधान सचिव, आ.वि. यांचे स्वीय सहाय्यक
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
सहसचिव/उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती का-१३, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.